**शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथे तसेच निवासी कर्मचारी वसाहत परिसरात भुयारी गटार योजनेच्या बांधकाम अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता प्रदान करणेबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग

शासन निर्णय क्रमांक : जीसीएम-२०२२/प्र.क्र.३६९/प्रशा-१
गोकुळदास तेजपाल रुग्णालय आवार, ९ वा मजला,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई-४०० ००१.
दिनांक : १३ फेब्रुवारी,२०२३

**वाचा :** आयुक्त, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.संवैशिवसं/ शावैमवरुमिरज/निपभुयारीगटायोजना/३९३२/आय-प/२२, दिनांक २९/११/२०२२

**शासन निर्णय :**

विभागाच्या नियंत्रणाखालील शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज येथे तसेच निवासी कर्मचारी वसाहत परिसरात भुयारी गटार योजनेच्या खालील विवरणपत्रात नमूद एकूण रुपये रु. ११,२०,५६,९००/- (अक्षरी रुपये अकरा कोटी, वीस लक्ष, छपन्न हजार, नऊशे मात्र) इतक्या रक्कमेच्या अंदाजपत्रकास पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

| अनु.क्र. | बांधकामाचे नाव | अंदाजित किंमत |
|---|---|---|
| १. | Underground Drainage Scheme for Govt. Medical College and Residential Staff Quarters Campus, Miraj | ११,२०,५६,९०० |
| | **एकूण अंदाजित किंमत** | **११,२०,५६,९००** |

**अटी व शर्ती :-**

१) सदर काम करण्यापूर्वी जागेच्या मालकी हक्काबाबत पूर्तता करण्यात यावी.

२) प्रस्तुत काम पुरातत्व विभागाच्या अखत्यारित येत असल्यास संबंधित विभागाची तसेच महानगरपालिका व तत्सम प्राधिकरणे यांची पूर्व परवानगी घेण्यात यावी.

३) तांत्रिक मंजूरी देताना राज्य दरसूचीबाह्य बाबींच्या दराकरीता शासन परिपत्रक क्रमांक-२०१७/प्र.क्र.११/नियोजन-३, दिनांक ११.०४.२०१७ नुसार कार्यवाही करण्यात यावी.

४) प्रस्तावातील खरेदीशी संबंधित बाबींकरिता ई-निविदा प्रणालीचा अवलंब करुन उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाकडील दिनांक २४.०८.२०१७ च्या शासन निर्णयान्वये निर्गमित केलेल्या सूचना विचारात घ्याव्यात.

५) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३ /प्र.क्र.१७७ / तां.क्र.१, दिनांक १० जानेवारी, २०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

६) स्थापत्य कामाच्या कालावधीतच विद्युतीकरणाबाबत तसेच इतर अनुषंगिक कामांचे योग्य नियोजन करुन सदर कामे पूर्ण करावीत.

७) दिव्यांगाकरिता उपलब्ध करुन द्यावयाच्या विविध सोयीबाबत शासनाने वेळोवेळी दिलेल्या सूचनांच्या अनुषंगाने कार्यवाही करण्यात यावी.

८) प्रस्तावित नवीन ड्रेनेज लाईन, एसटीपी प्लँट बसविण्याची कामे ज्या इमारतीवर करण्यात येणार आहेत, ती इमारत नवीन बांधकाम करण्यासाठी सुरक्षित व मजबूत आहे, याबाबत सक्षम प्राधिका-याची मान्यता घेण्यात यावी.

९) विषयांकित कामाकरिता सुधारित प्रशासकीय मान्यतेची आवश्यकता लागणार नाही, यादृष्टीने विशेष दक्षता घेऊन काम करण्यात यावे.

२. सदर कामासाठी येणारा खर्च खालील लेखाशीर्षात मंजूर होणाऱ्या निधीतून भागविण्यात यावा.

| |
|---|
| मागणी क्रमांक - एच-०८ |
| ४२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य यावरील भांडवली खर्च |
| ०३, वैद्यकीय शिक्षण, प्रशिक्षण व संशोधन |
| १०५-विषमचिकित्सा पंचवार्षिक योजनांतर्गत |
| (४२१० ००४१) ५३- मोठी बांधकामे |

३. वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक: विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/विनियम, भाग-२, दिनांक २०.०९.२०१९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका-१९७८ भाग-१, उप विभाग-५ अनुक्रमांक-१, महाराष्ट्र सार्वजनिक बांधकाम नियमपुस्तिकेतील परिच्छेद क्रमांक १३४ (१) नुसार प्रशासकीय विभागाला प्रदान केलेल्या वित्तीय अधिकारानुसार सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०२३०२१५१७३८३५३५१३ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUDHIR JAYA SHETTY

Digitally signed by SUDHIR JAYA SHETTY
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MEDICAL EDUCATION AND DRUGS DEPARTMENT, 2.5.4.20=72ea277025fdf5a4898b244953b82406eea05963bc456f1e1e8621e5917d8305, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=E9D37D499A521B728AEB3DC8EC38B759420308B9FD7816002B4AF0FFBF1111D7, cn=SUDHIR JAYA SHETTY
Date: 2023.02.16 20:09:30 +05'30'

**(सुधीर जया शेट्टी)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रति :-**

१) अपर मुख्य सचिव, सार्वजनिक बांधकाम विभाग, मंत्रालय, मुंबई

२) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई

३) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
४) आयुक्त (वैद्यकीय शिक्षण), वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
५) महालेखापाल-१ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
६) संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई
७) मुख्य अभियंता, सार्वजनिक बांधकाम प्रादेशिक विभाग, पुणे
८) मुख्य अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, पुणे प्रादेशिक विभाग, पुणे
९) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मिरज
१०) कार्यकारी अभियंता, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण विभाग,सांगली
११) अधिष्ठाता, शासकीय वैद्यकीय महाविद्यालय व रुग्णालय, मिरज
१२) जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली
१३) निवडनस्ती (प्रशा-१)